**कार्यकंत्राटकर थकबाकीदारासाठी व्याज व**
**शास्तीविषयक सवलत योजना.**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-डब्ल्यूसीए-१४.०२/प्रक्र.२२८/कराधान-१,**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२, दिनांक: ६ जानेवारी २००३.**

**वाचा:-** शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक-एसटीए-११९८/प्रक्र.५०/कराधान-१, दिनांक २५ नोव्हेंबर १९९८.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र कार्यकंत्राटाच्या अंमलबजावणीत अंतर्भूत असलेल्या मालातील मालमत्तेच्या हस्तांतरणावरील विक्रीकर (पुनरधिनियमित) अधिनियम, १९८९ मधील) थकबाकी संदर्भात शासनाने दिनांक २५.११.९८ रोजी ३१.३.९८ पर्यंतच्या निर्धारणा कालावधीसाठी अभय योजना प्रसृत केली होती. वेळोवेळी त्यात करण्यात आलेल्या सुधारणांनंतर दिनांक ३१.३.२००० रोजी योजना समाप्त करण्यात आली. या अभय योजनेत बांधकाम कंत्राटाकरिता तडजोड रकमेचा दर १ टक्का व इतर कंत्राटाकरिता ३ टक्के एवढा निश्चित करण्यात आला.

शासनाच्या दिनांक ६ फेब्रुवारी १९९९ च्या अध्यादेशाअन्वये (शासन अध्यादेश क्र.२) कार्यकंत्राट अधिनियमात सुधारणा करण्यात आली व बांधकाम कंत्राटाकरिता २ टक्के तडजोडीची रक्कम व इतर कंत्राटाकरिता ४ टक्के तडजोड रक्कम निश्चित करण्यात आली. ही सुधारणा पूर्वलक्षी प्रभावाने म्हणजेच दिनांक १.५.९८ पासून अंमलात आली. विक्रीकर आयुक्तांनी याबाबतीत परिपत्रक काढून (परिपत्रक क्र.६टी दिनांक २५.२.१९९९) सदर सुधारणेबाबत स्पष्टीकरण संबंधितांना कळविले.

तसेच या अध्यादेशाद्वारे कलम ६अ मध्ये कलम १अे नव्याने अंतर्भूत करण्यात आले. या कलमाअन्वये (on going contact) जे दि.१.४.९२ किंवा तद्नंतर व दि. ३१.४.१९९८ च्या अगोदर प्रदान करण्यात आली असून ती दि. १.५.९८ नंतर चालू असतील अशा बांधकाम कंत्राटाकरिता कराचा दर १ टक्का व इतर कंत्राटाकरिता ३ टक्के निश्चित करण्यात आला.

अभय योजनेअन्वये देय असलेली कराची रक्कम व पूर्वलक्षी प्रभावाने अधिनियमात सुधारणा करण्यात आल्यामुळे देय असलेल्या कराच्या रकमेचा भरणा एकाच वेळी करणे बांधकाम कंत्राटदारांना भाग पडले यामुळे करभरणा करण्यास उशिर व त्याअनुषंगाने दंड व व्याज आकारणी अपरिहार्य झाली.

शासनाकडे याबाबत सवलत देण्याकरिता अनेक निवेदने प्राप्त झाली त्याचा साकल्याने विचार करुन मा.अर्थमंत्र्यांनी वित्तीय वर्ष २००२-२००३ चे अंदाजपत्रक सादर करताना संबंधितांना व्याज व शास्ती मध्ये सवलतदेण्याचे जाहीर केले. तदनुसार खालीलप्रमाणे सवलत देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

## शासन निर्णय

दिनांक १.४.९८ ते ३१.३.९९ पर्यन्त संपणा-या निर्धारणा कालावधीकरिता देय असलेले व्याज/शास्तीबाबतच्या सवलती पुढील अटीच्या अधीन राहून दिल्या जातील.

१. थकबाकीदाराने अर्ज केल्यास

अ) दिनांक १.४.९८ ते ३१.३.९९ पर्यंतचा कर दिनांक ३०.४.९९ पर्यंत संपूर्ण भरणा केला असल्यास व्याज/शास्ती संपूर्णपणे माफ होईल.

ब) दि.१.४.९८ ते ३१ ३१.३.९९ पर्यंतच्या कालावधीकरिता देय असलेला कर दिनांक ३०.४.९९ नंतर पण दिनांक ३१.३.२००० अगोदर भरणा केला असल्यास देय व्याज/शास्ती ७० टक्के माफी दिली जाईल.

(येथे उल्लेख केलेली शास्ती व व्याज याचा अर्थ कार्यकंत्राट अधिनियमाखाली. मुंबई विक्रीकर अधिनियमाच्या कलम ३६ व ३७ च्या आधारे लावलेली कोणतीही शास्ती व व्याज असा आहे.)

२. कोणत्याही परिस्थितीत भरणा केलेल्या रकमेचा परतावा या शासन निर्णयाच्या आधारे देय होणार नाही. तसेच अर्जदारास या कालावधीकरिता दाखल केलेले अपिल बिनशर्त मागे घ्यावे लागेल.

३. या शासन निर्णयाचा आधार घेऊन अपिल/निर्धारणा किंवा इतर कोणतीही वैधानिक आदेश पारित करता येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(एस.एन.जागोदे)
शासनाचे उप सचिव

प्रत:-

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई.
४) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०००१०.(४० प्रती).
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) निवड नस्ती, कराधान-१.